केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत सन २०२३-२४ करीता सर्वसाधारण योजनेतून २२१०F१५७ या लेखाशिर्षातून ६०% केंद्र हिश्श्याचे रू.२५१२०.०० लक्ष व २२१०५२४६ लेखाशिर्षातून ४०% राज्य हिश्श्याकरिता रु.१६७४६.६७ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-१३२३/प्र.क्र.२७४/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २१ जुन, २०२३

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दिनांक १२.०४.२०२३.

२) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/कें रा.हि./२४२२५-२३१/२०२३-२४, दिनांक २५.०५.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहज साध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरू केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive child Health), नियमित लसीकरण, मिशन फ्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलियो लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने प्रस्तुत प्रकरणी केंद्र व राज्य शासनाचा प्राप्त झालेला निधी सन २०२३-२४ च्या मुळ अर्थसंकल्पीत तरतुदीतुन पुढील प्रमाणे वितरित केलेला आहे. त्याबाबतचे विवरणपत्र पुढीलप्रमाणे आहे

(रुपये लाखात)

| अ.क्र. | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | सन २०२३-२४ ची अर्थसंकल्पीय तरतुद | वितरीत केंद्र हिस्सा | सन २०२३-२४ ची अर्थसंकल्पीय तरतुद | वितरीत राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|
| १ | शा.नि.क्र.बीयुडी-१३२३/ प्र.क्र.२६९/२३/आरोग्य-७ दि. १६/०६/२०२३ | १४५७४७.९६ | -- | ८१२००.०० | ६८०१.२३ |
| २ | शा.नि.क्र.बीयुडी-१३२३/ प्र.क्र.२२६/आरोग्य-७ दि. १९/०६/२०२३ | | -- | | १३९७.४३ |
| | **एकूण वितरीत अनुदान :-** | | -- | | ८१९८.६६ |
| | **वितरणासाठी उपलब्ध तरतूद** | १४५७४७.९६ | | ७३००१.३४ | |

उपरोक्त विवरणपत्रात नमूद केल्यानुसार राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी सर्वसाधारण (General) वर्गवारीसाठी उपलब्ध करुन दिलेल्या केंद्र हिस्सा २२१०F१५७ या लेखाशिर्षातंर्गत रु.२५१२०.०० लक्ष तसेच सदर रकमेच्या समरुप राज्य हिश्श्यापोटी २२१०५२४६ या लेखाशिर्षातंर्गत सर्वसाधारण वर्गवारीतून ४०% राज्य हिश्श्याचा रु.१६७४६.६७ लक्ष इतका असा एकूण रु.४१८६६.६७ लक्ष निधी सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय अंदाजातील तरतूदीतून राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## <u>शासन निर्णय :-</u>

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी (General) सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्यासाठी लेखाशिर्ष २२१०F१५७ करिता रु.१५४४७.९६ लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीतून केंद्र हिश्श्याचे रु.२५१२०.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्यास तसेच राज्य हिश्श्याचे लेखाशिर्ष २२१०५२४६ करीता अर्थसंकल्पीय तरतूद रु.८१२००.०० लक्ष एवढी तरतूद करण्यात आली आहे. सदर राज्य हिश्श्याच्या तरतूदीतून रु.८१९८.६६ लक्ष रक्कम वितरीत झाली असून रु.७३००१.३४ लक्ष तरतूद शिल्लक आहे. सबब, सदर शिल्लक तरतूदीतून राज्य हिश्श्याचे रु.१६७४६.६७ लक्ष इतकी रक्कम लेखाशिर्ष २२१०५२४६ खाली अशी एकूण केंद्र व राज्य हिश्श्याची मिळून रु.४१८६६.६७ लक्ष वितरीत करुन राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त,

आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पीय तरतुदीतुन भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ चा अर्थसंकल्पीय तरतुद | मागणी रक्कम (केंद्र ६०%) (राज्य ४०%) |
| १ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००- इतर खर्च; सर्वसाधारण योजना (०१)(१८) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (६० टक्के केंद्र हिस्सा) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०F१५७ | १४५४४७.९६ | २५१२०.०० |
| २ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००- इतर खर्च; सर्वसाधारण योजना (०१)(१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (४० टक्के राज्य हिस्सा) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०५२४६ | ८१२००.०० | १६७४६.६७ |

४. वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

६. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

८. सदर अनुदान सशर्त असून यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२६/का.१४७२, दिनांक ०८.०६.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २४१/व्यय-१३, दिनांक १४.०६.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१९२०१६३८६९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.06.21 11:53:44 +05'30'

**( राजेंद्र वि कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे

६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
११.निवडनस्ती ( आरोग्य -७) .